अंधोरी साठवण तलाव ता. अहमदपूर , जि. लातूर या कामाच्या अंदाजपत्रकास विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२१/ (प्र.क्र.२८१/२०१९)/ सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २१ फेब्रुवारी २०२२

वाचा:-

१. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र.जा.क्र.गोमपाविम-/तां-१/विवसु कडा बीड /धा.क्र. २७ / ७९०१ दि.७/८/२०१९

प्रस्तावना:-

अंधोरी साठवण तलाव ता. अहमदपूर तालुक्यातील मौजे अंधोरी जवळील येलदरवाडी येथील वाहणा-या नाल्यावर खालच्या बाजूस ३ कि मी अंतरावर बांधण्यात आलेला आहे. या साठवण तलावाचे एकूण पाणलोट क्षेत्र ५.४९ चौ. कि मी आहे. सदर तलावाचे बांधकाम जुन २००६ मध्ये पुर्ण झाले आहे. प्रकल्पाची प्रकल्पीय साठवण क्षमता १.२१९ द.ल.घ.मी. असून सदर तलावाचे उपसा सिंचनव्दारे वरील बाजूस व बाजूच्या तिरावर ३६८ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होतो. अंधोरी साठवण तलावाच्या पुच्छ कालव्याची लांबी २४० मी. व रूंदी ३० मी. असून पुच्छ कालव्याला तीव्र उतार आहे. पुच्छ कालव्याला आडवा तीव्र उतार असल्याने पुराचा विसर्ग पुच्छ कालव्याच्या डाव्या बाजूने मार्गदर्शक भिंतीच्या नजीकच्या स्थरांची झीज होऊन मार्गदर्शक भिंतीच्या समांतर खडडयांचा चर पडला आहे. संपुर्ण ठिकाणी मार्गदर्शक भिंतीचा पाया उघडा पडला आहे. त्यामुळे मार्गदर्शक भिंतीस धोका निर्माण झाला आहे. तसेच मार्गदर्शक भिंत व Toe वॉलचा संपूर्ण पाया उघडा पडून धरणाला धोका निर्माण झाल्याची बाब निदर्शनास आली आहे. त्याअनुषंगाने धरण सुरक्षितता संघटना, नाशिक यांचे वार्षिक धरण स्थिती अहवालातील त्रुटी व त्यांचे प्रत्यक्ष भेटीच्या अनुषंगाने निर्गमित निरिक्षण टिप्पणी यातील त्रुटींचे निराकरण करणेकरिता अंधोरी साठवण तलाव ता. अहमदपूर , जि लातूर या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद अंतर्गत अंधोरी साठवण तलाव ता अहमदपूर जि. लातूर या योजनेच्या विशेष दुरुस्तीच्या रू.**३४,८४,६३६/-** (रू. चौतीस लक्ष चौ-याऐंशी हजार सहाशे छत्तीस फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), दि. १.१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे बंधनकारक आहे.

२. शासन पत्र दि. ४/६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे एक वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे प्रस्तावात दर्शविलेले असून यात तांत्रिक मान्यता प्रदान करताना त्यात बदल करण्यात येऊ नये .

५. प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम/ तोडफोड याद्वारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

६. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

७. विषयांकित प्रशासकीय मान्यता अंदाजपत्रकातील तरतूदी, दर, वहनअंतर ,संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

८. सदर प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. तसेच प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेची मंजूरी दिल्या नंतर पुन्हा सुधारीत प्रशासकीय मान्यता देता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

९. सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जाबबदारी क्षेत्रीय अधिकार्याची राहील.

शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१६/२७/२०१६/लपा-०२ दिनांक २६/०५/२०१७ अन्वये रू. ५.०० कोटी किमंतीच्या मर्यादेतील विशेष दुरूस्ती कामास आंतरवित्त सल्लागार यांचे सहमतीने मान्यता देण्याबाबतचे अधिकार जलसंपदा विभागास आहेत. त्या अनुषंगाने आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० - सर्वसाधारण , १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत (००) (१४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद भाग भांडवली अंशदान ( मराठवाडा विभाग ) (४७०२ ७४४३) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ४२ सन २०२१- २०२२ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२११५०५३६१३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.02.21 15:08:06 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय.
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) मा.मंत्री,जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरी क्षा),महाराष्ट्रराज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
१४) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग , औरंगाबाद
१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६) अधीक्षक अभियंता व प्रशासक , लाभक्षेत्र विकास प्राधिकरण , बीड,
१७) कार्यकारी अभियंता, लातूर पाटबंधारे विभाग क्र. २ , लातूर
१८) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०१९/ (प्र.क्र.२८१/२०१९)/ सिंव्य (कामे),**

**दि. २१/०२/२०२२ चे सहपत्र**

| **Sr.No.** | **Item** | **Amount ( Rs. )** |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | 2751773 |
| 2 | Royalty | 265980 |
| 3 | Add 10 % Royalty for DMF Charges | 26598 |
| 4 | 1 % Insurance | 27518 |
| 5 | 12 % GST | 330213 |
| 6 | 3 % Contingencies | 82554 |
| | **Total Rs.** | 3484636 |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.02.21 15:08:21 +05'30'

( वैजनाथ चिल्ले )

शासनाचे उप सचिव